# ब्रह्मविचार

## आचार्य भाष्याचें महत्त्व—

भगवत्पूज्यपाद श्रीमच्छङ्कराचार्य यांनीं लोकांवर अनुग्रह करण्यासाठीं आपल्या अतुल बुद्धिसामर्थ्यानें प्रचंडवाद्यांच्या दुस्तर्कांचें निवारण करून—श्रुत्यनुकूल तर्कांच्या बलावर उपनिषदांचा यथार्थ आशय भाष्यद्वारां जनतेला प्रकट करून दाखविला. वेदाचा अर्थ धर्ममीमांसा आणि ब्रह्म-मीमांसा यांनीं लावता येतो. मन्त्र व ब्राह्मण यांतील वाक्यांचा विचार धर्ममीमांसेनें केला आहे; परन्तु धर्ममीमांसेनें उपनिषद्वाक्यांना गौणत्व दिल्यामुळें उपनिषदांचा अर्थ धर्ममीमांसेनें करिता येत नाहीं. चारी वेदांच्या अनेक शाखांचीं अनेक उपनिषदें आहेत. वरवर पाहणाऱ्याला त्यांतील वचनें परस्परविरूद्ध असल्याचा भास होतो. म्हणून अशा वचनांचा समन्वय करण्या-साठीं भगवान् बादरायणांनीं ब्रह्ममीमांसा केली. त्या ब्रह्ममीमांसेवर किंवा वेदान्तसूत्रावर सविस्तर भाष्य लिहून श्रीबादरायणांना अभिप्रेत असलेला

श्रुतीचा अर्थ आचार्यांनीं सांगून व शिष्यपरंपरा चालवून वेदान्तविद्येचा संप्रदाय निष्कंटक सुरू केला.

श्रुति, युक्ति व अनुभव यांवर भाष्याची उभारणी झाली असल्यामुळें, आचार्यांच्या भाष्याचा जगांतील तत्त्वज्ञानावर फारच मोठा परिणाम झालेला आहे. हल्ली पाश्चात्य तत्त्वजिज्ञासूला सुद्धां शांकरमताचा खोल अभ्यास करावा लागतो. कारण उपनिषदांचा खरा अर्थ शंकराचार्यांनींच केला आहे, अशी सर्व सुविद्य लोकांची खात्री पटलेली आहे. त्यामुळें शांकरमताचा जसजसा खोल अभ्यास होत जाईल, तसतसा अद्वैतवेदान्तावर येणाऱ्या आक्षेपांचा नाश होत जाऊन जगाचें तत्त्वज्ञान अद्वैताकडे झुकूं लागेल असा आमचा दृढ विश्वास आहे. श्री. मणीलाल द्विवेदी यांनीं मांडूक्याच्या प्रस्तावनेंत असें म्हटले आहे कीं—

"As between Shankar and ramanuja, an able scholar , Dr.

Thibaut of Benares, gives the palm to the latter. But all the same he record it as his emphatic opinion that if any one of the interpreters of the प्रस्थानाs has fully understood and impartially explained the philosophy of the उपनिषद्s it is Shankar and no one else. '' थिबोसारख्या पंडिताचा ओढा जरी श्रीरामानुजांकडे असला तरी त्याचें स्पष्ट मत असें आहे कीं, आचार्यांनीं उपनिषदांतील खरें तत्त्व जाणून तें आपल्या भाष्यांत उतरविलें. ही गोष्ट दुसऱ्या कोणालाहि करतां आली नाहीं. पुढें ते म्हणतात— this has been the universal opinion of the best minds of India, but I cite the authority of

a Euroiean scholar to assure reader that Shankar can always be trusted and with the most unreserved confidence, in his treatment of philosophical points and his explanation of the Upanishad-doctrine ( page 1-2 ). ह्यावरून आचार्यांवर नि:शंकपणें विश्वास ठेवावयास कांहीं हरकत नाहीं. असें सर्व भारतीय पंडित व पाश्चात्य पंडित यांचें मत आहे, असें स्पष्ट होत आहे.

आचार्यांनीं तत्त्वज्ञानाच्या जोरावर पूर्वीच्याकाळीं राष्ट्रीय धर्माची—एकत्वाची कल्पना सर्वांना आणून दिली. धर्मापासून आणि वैदिक तत्त्वज्ञानापासून च्युत होणाऱ्या मरणोन्मुख राष्ट्राला अत्यंत प्राचीन आणि अत्यंत विशुद्ध अशा आध्यात्मिक संस्कृतीची ओळख करून दिली;

इतकेंच नव्हें तर तिची प्रस्थापना पुनः एकदा भक्कम पायावर केली. व राष्ट्रामध्यें जिवंतपणा आणला—असें प्रो. मणीलाल द्विवेदी यांनीं म्हटलें आहे. ( Thus he infused fresh life in and gave resisting power to the dying past of the nation once more placed on solid foundation , the most ancient and at the same time the most universally refined spiritual civilization the world possesses fron the " imitation of Shankar" by Prof. M. N. Dvivedi. )

सांप्रतच्या सर्व दुःखातून मुक्त होण्याकरितां हिंदु-स्थाननें आणि साऱ्या जगानें या तत्त्वज्ञानाचा पुनः आश्रय करावा; आणि हें एवढ्याच प्रसंगापुरतें नसून पुढें येणाऱ्या सर्व प्रसंगीं याचा

लाभ घेतां येईल. ही गुरूकिल्ली जनतेच्या हातीं दिल्याबद्दल आपण श्रीशंकराचार्यांचे ऋणी असलें पाहिजे—असेंहि श्री. द्विवेदी यांनी पान १७ वर म्हटलें आहे.{ India and the world at large must find salvation and relief from all the ills of the present in a fresh application of this philosophy to the situation. And this not once but forever and anon in all time to come. That is the kee we have to thank Shankar for.} आचार्यांचें तत्त्वज्ञान कोणत्या तरी एका विवक्षित कालाकरितांच होतें असें नसून पुढें येणाऱ्या सर्व कालामध्येंहि तसेंच उपयोगी पडणारें आहे ही गोष्ट सहज सिद्ध होणारी आहे.

वाचकांनी एक गोष्ट विशेष लक्षांत ठेवण्या-सारखी आहे; ती ही कीं—आचार्यांनीं आपल्या भाष्यांत कोठेंहि ‘अमुख हें माझें मत आहे’ असें म्हटलेलें नाहीं. उलट, ठिकठिकाणीं त्यांनीं ‘अमुक हें औपनिषद मत आहे’ असेंच म्हटलें आहे; ह्यावरून आचार्यांनीं आपलीं मतें उपनिषदें व सूत्रें यावर लादलीं असा जो आरोप आचार्यां-वर वेळीं अवेळीं केला जातो तो अगदीं फोल आहे, असें कोणालाहि मानणें भाग आहे. आचार्यांनीं भाष्यांत प्रत्येक मुद्याला उपनिषदांचीं वाक्यें प्रमाण म्हणून दिलेलीं आहेत. श्रीरामानुजांप्रमाणें आपल्या मताला पोषक अशीं उपनिषद्वाक्यें न मिळाल्यामुळें पुराणवचनांचा आश्रय करण्याची पाळी आचार्यांना केव्हांहि आली नाही. ‘उपनिषत्सिद्धांताला धरून शांकरभाष्य आहे’ असें डॉ. थिबोहि म्हणतात, पण हें म्हणतांना सांप्रदायाच्या अविवेकामुळें डॉ. थिबो निराळ्या प्रकारानें आचार्यांवर हल्ला करितात. ते असें म्हणतात कीं—आचार्यांचा सिद्धांत उपनिषदांच्या जवळ जवळ जरी येत असला तरी तो सूत्रकारांच्या मताविरूद्ध आहे.

{ The philosophy of Shankar would on the whole stand nearer to the teachings of the Upanishads than the sutras of Badarayan – Introduct-ion to Vedant sutras Page exxvi }

ब्रह्मसूत्रांतील प्रत्येक सूत्राचीं विषयवाक्यें उपनि-षदांतीलच आहेत व उपनिषदवाक्यांचा निश्चित अर्थ करण्याकरितां ब्रह्ममीमांसा निर्माण झाली आहे—ही गोष्ट सर्वमान्य आहे. आचार्यांनींहि भाष्यांत, 'वेदान्तवाक्यकुसुमग्रथनार्थत्वात् सूत्राणाम् वेदान्तवाक्यानि हि सूत्रैः उदाहृत्य विचार्यन्ते।' (.वे. भा. १—१—२—२) वेदान्तसूत्रें उपनिषद्वाक्य-रूपी पुष्पें गुंफण्यासाठीं केलेलीं आहेत. कारण सूत्रांनीं उपनिषद्वाक्यांचा उल्लेख करून त्यांचा विचार केला जातो—असें स्पष्ट म्हटलेलें आहे. तेव्हां उपनिषद्वाक्यांचा अर्थ निश्चित करणारे सूत्रकार उपनिषत्सिद्धांताच्या विरूद्ध सूत्रें रचतील हें कधीं तरी शक्य आहे काय, याचा विचार निर्विकार मनानें पत्येकानें करावा.

अद्वैताशीं सांप्रदायिक आग्रहामुळें ज्यांचें वैर आहे असें द्वैती सोडून बाकीचे जे आचार्यांवर आक्षेप घेणारे आहेत, त्यांचे आमच्या मतें दोन वर्ग पडतात. (१) शांकरमत चांगलेंसें न समजल्यामुळें मायेवर आक्षेप घेणारे. यांत हेगेलसारखे पाश्चात्य व कांहीं आधुनिक सुशिक्षित (२) मुद्दाम खोडसाळपणानें आचार्यं मताचा विपर्यास करून अर्थाचा अनर्थ करणारे कांहीं धूर्त. ह्यांची मजल आचार्यांना 'मनाचा अवैदिक ग्रह करून भाष्य लिहिणारे'—म्हणण्या-पर्यन्त गेली आहे व कांहीं तर 'ब्रह्म हें जड आहे' असेंहि म्हणतात. असो.

हेगेलसारखे परदेशी पंडित अद्वैतावर आक्षेप कां घेतात याचें अचूक कारण रा.ब.कीर्तिकरांनीं आपल्या 'Studies in Vedant' ह्या पुस्तकांत असें सांगितलें आहे कीं—''The word Maya plays a most important part in the philosophy of the अद्वैतवेदान्त and it

is the word that has misled foreigners and even puzzled in a manner, the Indian mind , the greatest blunder in this connection being that it is associated with the idea of illusion as meaning a positive blank ’’ ( page 38)

येथें माया शब्दाचा अर्थ नीट न कळल्यामुळें पुष्कळांना अद्वैततत्त्व हें कांहीं तरी शून्यात्मक किंवा अभावात्मक असावें असें वाटतें. ‘‘The objection urged against the Indian. Vedant stated in general terms, are that the Brahms of this system is an abstraction, an infinite blank…... its ethics is the negative ethics of

an Asceticism, which renounces the world and withdraws from it as from an empty illusion ( page 8 )

रा. ब. कीर्तिकरांनीं पाश्चात्यांचा वरीलप्रमाणें पूर्वपक्ष मांडून त्यांचें खंडनहि फारच मार्मिकपणें केलें आहे. तें जिज्ञासूंनीं अवश्य वाचण्यासारखें आहे. गैर समजुतीनें उद्भवलेल्या आक्षेपांचें निरसन करावयाचें झाल्यास खरें उपनिषत्तत्त्व काय आहे हें शांकरमताला धरून लिहिलें म्हणजे झालें. ब्रह्म म्हणजे काय? कार्य व कारण याचें अनन्यत्व कसें? अध्यासाचें स्वरूप काय? तें आम्ही सांगणार आहों. तसेंच असदादि सर्व ख्यातीचें खंडन करून अनिर्वचनीय ख्यातिच कां मानावयास पाहिजे, अध्यासाला कारण अविद्या—माया—अज्ञान कसें तें सांगून त्याचें स्वरूप व लक्षण, प्रत्यक्षादि प्रमाणांनीं सिद्ध करणार आहों. त्याचप्रमाणें मोक्ष म्हणजे काय? तो ज्ञानसाध्य आहे का कर्मसाध्य आहे? जीवाचें स्वरूप व ब्रह्माचें स्वरूप

त्याविषयीं निरनिराळी मतें आणि जीवब्रह्माचें ऐक्य, तीन प्रकारचीं शरीरें व त्यांची उत्पत्ति, तीन अवस्था व त्यांच्या मर्यादा, जीवाचें उत्क्रमण आणि पुनरागमन, वैदिक वर्ण व आश्रम, आत्मज्ञानासाठीं श्रवणादि साधनें वगैरे अनेकविध गोष्टींचें विवेचन करणें अत्यन्त आवश्यक आहे.

## औपनिषद सिद्धान्ताचें सामान्य स्वरूप

औपनिषद सिद्धान्ताचें सामान्य स्वरूप पुढील प्रमाणें आहे.''सृष्टीच्या आरंभीं एकच अद्वितीय सदाख्य(श्री सुरेश्वराचार्यांनीं नैष्कर्म्यसिद्धींत असें लिहिलें आहे.) आत्मतत्त्व होतें. त्यानें ज्ञानरूपी ईक्षण—आलोचन करून ही सृष्टि कशी करावी हें मनांत आणून तो स्वतःच बहुरूप बनून सृष्टिस्वरूप झाला. नंतर त्यानें तिच्यामध्यें जीवरूपानें प्रवेश केला व तो स्वाभाविक अविद्येमुळें, स्वतःच्या शुद्ध, बुद्ध, मुक्त स्वभावास विसरून '' हा मी व हें माझें '' अशा अध्यासानें कर्ता, भोक्ता, सुखी, दुःखी

झाला. ह्याला प्रत्यक्ष प्रमाण म्हणजे—'' आब्रह्मस्तम्बपर्यन्त'' सर्व प्राण्यांची निरनिराळ्या अनेक दु:खांपासून सुटका करून घेऊन सुख मिळविण्यासाठीं निरंतर प्रवृत्ति. सुख दु:खांचा भोग शरीरांत होतो. शरीरावांचून कसलेंहि दु:ख भोगलें जात नाहीं. तेव्हां शरीर ग्रहण हें दु:खाला हेतु आहे. बरें, हा देह कशाने प्राप्त होंतो? तर पूर्वजन्मीच्या धर्माधिर्मामुळें. धर्माधिर्माच्या उत्पत्तीला शास्त्रीय विहित व प्रतिसिद्ध्ध कर्में अनुक्रमें कारण होतात.कोणतीहि कर्में रागामुळें व द्वेषामुळें होत असतात. रागाला कारण' हा विषय मला प्रिय आह' अशी बुद्धि व द्वेषाला कारण ' हा विषय मला अप्रिय आहे' अशी बुद्धि. वास्तविक कोणताहि विषय प्रियत्व किंवा अप्रियत्व ह्या गुणांनीं युक्त नसतो. तर तो केवळ आरोप—' अवस्तुनि वस्त्वारोप:' अशा स्वरूपाचा आहे. रागद्वेषाला कारण होणारी वर सांगितलेली बुद्धि ही ' अतस्मिन् तद्बुद्धि:' अशी आहे. हें सर्व रज्जुवर भासलेल्या सर्पाप्रमाणें आहे. सर्पाची निवृत्ति अधिष्ठानज्ञानानें म्हणजे रज्जूच्या ज्ञानानें होते, त्याप्रमाणें

आध्यात्मिक अविद्यामूलक संसाराची निवृत्ति संसाराला अधिष्ठानभूत—सदाख्य—आत्मतत्त्वाच्या ज्ञानानें होते. सर्व अनर्थांला कारण आत्मस्वरूपाचें अज्ञान व अज्ञानाच्या निवृत्तीला केवल सम्यग्ज्ञानच कारण आहे. हें सम्यग्ज्ञान कोणत्याहि प्रत्यक्षादि लौकिक प्रमाणांना विषय होत नसल्यामुळें ती सर्व ब्रह्मसाक्षात्कारास निरूपयोगी होत, फक्त उपनिषद्वाक्येंच आत्मस्व-रूपाचें कथन करावयास व आत्म्याचें परोक्षज्ञान करून द्यावयास समर्थ आहेत. हें परोक्षज्ञानसुद्धां संप्रदायपूर्वक गुरूमुखातून श्रवण केलें तरच शुद्ध स्वरूपांत मिळावयाचे. पुढे श्रवण, मनन, निदिध्यासन इत्यादिकांच्या योगानें आत्मदर्शन सुलभ होऊन आत्मसाक्षात्कार होतो. हेंच आत्म्याचें अपरोक्षज्ञान होय. असा अपरोक्षज्ञानी पूर्वी विसरलेल्या स्वरूपाला, नित्य—शुद्ध—बुद्ध —मुक्त स्वभावाला जाणतो व देहपतन होईपर्यन्त तो आत्मानंदाचा उपभोग घेतो. देहपातानंतर तो आत्मस्वरूपीं लीन होऊन पुनः संसारांत येत नाहीं. ‘‘यत् गत्वा न निवर्तन्ते तत् धाम परमं मम’’ मनुष्यप्राणी ज्या परमोच्च गतीला किंवा

स्थितीला प्राप्त होऊं शकतो ती ही अवस्था होय. ह्यालाच मोक्ष किंवा मुक्ति असें म्हणतात व मोक्षासाठीं सर्व उपनिषदांची प्रवृत्ति आहे.

## उपनिषद्—शब्दाचा अर्थ

उप नि षद् याचा अर्थ ब्रह्मविद्या किंवा रहस्यविद्या असा होतो. हें कठउपनिषदाच्या उपोद्घातांत आचार्यांनीं उत्तम रीतीनें दाखविलें आहे. भाष्य—सदेर्धातोर्विशरणगत्यवसादनार्थस्य उपनिपूर्वस्य क्विपप्रत्ययान्तस्य रूपम्उपनिषद् इति —‘सद्’ धातूचा अर्थ निशरण, गति व अवसादन असा आहे. त्याला ‘उप’ व ‘नि’ उपसर्ग जोडून पुढें कर्तरि क्विप् होऊन ‘उपनिषद्’ असें नाम झालें. त्याचे तीन अर्थ असे—(१) ऐहिक व पारलौकिक विषयाविषयीं अतिशय विरक्त झालेले मुमुक्षु ल्या विद्येपाशी जाऊन निश्चयानें —आचार्यांच्या उपदेशानें अविद्यादि संसारबीजांचा नाश करतात ती विद्या. (२) जी मुमुक्षूंना पर ब्रह्माप्रत पोंचविते ती विद्या. (३) अग्निविद्या स्वर्गप्राप्तीचें निमित्त होत असल्यामुळें लोकान्तरीं

पुनः पुनः प्रवृत्त होणारा गर्भवास—जन्म—जरा इत्यादि उपद्रवसमूहास शिथिल करणें ह्या अर्थानें सांगितली जाणारी विद्या. तैतिरियोपनिषद्भाष्याच्या आरंभीं “ उपनिषदिति विद्योच्यते। तच्छीलिनां गर्भजन्मजरादिनिशातनात् तदवसानाद्वा ब्रह्मणोवोप यितृत्वादुपनिषण्णं वाऽस्यां परं श्रेयः” उपनिषद् विद्या. ती आपलें परिशीलन करणाऱ्या पुरूषाच्या—गर्भ, जन्म, जरा इत्यादिकांस शिथिल करीत असल्यामुळें किंवा त्यांचा नाश करीत असल्यामुळें अथवा ब्रह्मापाशीं नेऊन पोंचवित असल्यामुळें तिला उपनिषद् असें म्हणतात—असें भाष्यांत ठिकठिकाणीं म्हटलें आहे.

ही उपनिषद्विद्या गुप्त ठेवण्याचा व योग्य शिष्यास देण्याचा आग्रह उपनिषदांत धरलेला दिसून येतो. ‘गुह्या आदेशाः’ ( छां. ३—५—२) ‘परमं गुह्यम्’ ( ३—१७) व ( श्वे० ६—२२), ‘ वेदगुह्योपनिषत्सु गुह्यम्’ ( श्वे० ५—६) ‘ गुह्य तमम् ’ ( मै० ६—१९) इत्यादि ठिकाणीं विद्येला गुह्यत्व—गुप्तपणा दाखविला आहे.अपूर्ण